टिळक महाराष्ट्र विद्यापीठातील नेहरू सामाजिक शास्त्र विभागातील २ प्राध्यापक पदापैकी १ प्राध्यापक पद हे आयुर्वेद विभागाकडे वर्ग करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिमवि-२०१६/(१७४/१६)/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १९ जानेवारी, २०१७

वाचा :- (१) शासन निर्णय क्र.टिमवि १०९२/१९८३/विशि-१, दिनांक २९ मे १९९२
(२) शासन निर्णय क्र.टिमवि १०९०/१७१२/विशि-१, दिनांक २६ जून १९९६.

**प्रस्तावना:**

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे विद्यापीठाच्या तीन भागांना मिळून एकूण १७ शिक्षकीय पदे मंजूर आहे यामध्ये नेहरु सामाजिक शास्त्र विभागास २, प्राध्यापक ३, प्रपाठक पदे व ६ अधिव्याख्याता अशी एकूण ११ पदे संस्कृत विभागास १ प्राध्यापक, १ प्रपाठक, २ अधिव्याख्याता अशी ४ पदे आयुर्वेद विभागात - १ अधिव्याख्याता, १ प्रपाठक अशी २ पदे असे सर्व एकूण १७ पदे मंजूर आहेत.

आयुर्वेद विभागात केवळ दोनच पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. नेहरू सामाजिकशास्त्र विभागातील अनेक वर्षे रिक्त असलेले प्राध्यापक पद आयुर्वेद विभागाकडे वर्ग केल्यास Center of Excellence दर्जा विद्यापीठास मिळाल्यास आयुर्वेद विभागामार्फत Fundamental Research अंतर्गत संशोधन करण्यास आवश्यक मनुष्यबळाने विद्यापीठास वाव मिळेल. विद्यापीठाने यापूर्वी या क्षेत्रात महत्वपूर्ण योगदान दिले असल्याने हा दर्जा मिळाल्यामुळे विद्यापीठामध्ये आयुर्वेदातील जागतिक दर्जाचे संशोधन होऊन जागतिक पाताळीवर पोहोचण्यास मदत होईल.

सदर बाब विचारात घेता आयुर्वेद विभागातील एकूण संशोधन कार्य व इतर बाबींचा विचार करुन विद्यापिठातील नेहरू सामाजिक शास्त्र विभागातील २ प्राध्यापक पदापैकी १ प्राध्यापक पद हे आयुर्वेद विभागाकडे वर्ग करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे विद्यापीठातील नेहरु सामाजिक शास्त्र विभाग, संस्कृत विभाग, आयुर्वेद विभाग असे तीनही विभागामध्ये आकृतीबंधाप्रमाणे एकूण १७ शिक्षकीय पदे मंजूर करण्यात आली होती. ती नेहरु सामाजिक शास्त्र विभागास २, प्राध्यापक ३, प्रपाठक पदे व ६ अधिव्याख्याता अशी एकूण ११ पदे संस्कृत विभागास १ प्राध्यापक, १ प्रपाठक, २ अधिव्याख्याता अशी ४ पदे आयुर्वेद विभागात - १ अधिव्याख्याता, १ प्रपाठक अशी २ पदे या प्रमाणे आहेत.

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये टिळक महाराष्ट्र विद्यापीठास आठव्या पंचवार्षिक योजनेतंर्गत मंजूर पदांचा भार दि.१ एप्रिल १९९६ पासून शासनाने स्विकारला आहे. सदर बाब विचारात घेऊन नेहरु सामाजिक शास्त्र विभागातील प्राध्यापकाचे १ पद हे जाहिरात देऊनही योग्य उमेदवार उपलब्ध झाला नसल्यामुळे अनेक वर्षापासून रिक्त असल्याने हे पद आयुर्वेद विभागात वर्ग केल्यास कोणत्याही प्रकारचा

जादा आर्थिक भार शासनावर येणार नसल्याने, तसेच नवीन पदाची मागणी करण्यात येणार नाही या अटीचे अधिन राहून टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठास पद वर्ग करण्यास शासन मंजूरी देत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २९ डिसेंबर २०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११९१२३१२९९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.01.19 12:35:09 +05'30'

( सिध्दार्थ खरात )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आवश्यक त्या कार्यवाही साठी अग्रेषित.
२. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
३. मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
४. उप सचिव(विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
५. महालेखापाल-१ (लेखा विभाग), महाराष्ट्र, मुंबई.
६. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई
७. महालेखापाल-२(लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर
८. महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/निवासी लेखा परीक्षा अधिकारी
१०.कुलगुरु, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे
११.कुलसचिव, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे
१२.वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
१३.निवड नस्ती (विशि-४).